# एकत्र

**-- चं.प्र.देशपांडे**

मध्यमवर्गीय माणसाचे घर. बसण्याउठण्याची खोली. डाव्या बाजूला स्वयंपाकघराच्या खोलीकडे जाण्याचे दार. उजव्या बाजूला प्रवेशव्दार. समोर मध्यभागी खिडकी. खिडकीतून आकाशातला एक लहानसा ढग दिसतो.डाव्या बाजूच्या भिंतीला लागून एका टेबलावर टी.व्ही. दोनतीन साध्या लाकडी खुर्च्या. एक पलंग --समोरच्या भिंतीजवळ. त्यावर ट्रँझिस्टर पडलेला. एकदोन कॅलेंडर्स. एका कॅलेंडरवरच शर्ट अडकवलेला.

धुणे वाळत घालायची एक दोरी. त्यावर नेसून झालेले एक चुरगळलेले पातळ. एक सुमारे नऊदहा वर्षांच्या मुलीचा फ्रॉक. एक सातआठ वर्षांच्या मुलाची चड्डी आणि एक गंजीफ्रॉक. एक चुरगळलेले वर्तमानपत्र खाली पडलेले.

वेळ दुपारची. ट्रँझिस्टरवर ' विविध भारती 'चालू आहे. ( गाणे -- ' बंबईचा बाबू ' चित्रपटातील --महंमद रफीने गाईलेले -- ' साथी न कोई मंजिल ... ' ). पलंगावरच्या चादीवरून 'तो ' झोपून उठल्याची कल्पना यावी. तो टॉवेलने तोंड व हात पुसत स्वयंपाकघरातून बाहेर येतो -- त्या चालू असलेल्या गाण्याची शीळ घालीत. गाणे उदासवाणे,अस्वस्थता निर्माण करणारे. ती अस्वस्थता घालवण्यासाठीच जणू तो शीळ जोरात वाजवू लागतो. घरात तो एकटाच आहे. पोषाख -- पायजमा नि गंजीफ्रॉक.

थोड्या वेळाने गाणे संपते. नंतर त्या गाण्याबरोबरच तो कार्यक्रमही संपल्याचे ( अर्थात हिंदीतून ) सांगण्यात येते. तो टॉवेल पलंगावर टाकतो. मग " संपला -- छान ! " असे म्हणत ट्रँझिस्टर बंद करतो. नंतर तिथेच टेबलावर असलेला कागद उचलतो. काही विशेष नाही असे पाहून ठेवून देतो. मग पुन्हा त्या गाण्याची शीळ वाजवीत पुढे येतो. ते खाली पडलेले वर्तमानपत्र उचलतो. त्याची नीट घडी करतो. मग पलंगावर पडून ते वाचू लागतो. अर्थात त्याने ते एकदा वाचलेले असल्यामुळे ते त्याला पुन्हा वाचावेसे वाटत नाही. उठून ती घडी टेबलावर ठेवतो. मग पुन्हा पलंगावर पडतो. तसाच पडून राहातो. पण एकदा झोप झालेली असल्याने त्याही स्थितीत बरे वाटत नाही. उठून बसतो. पण तसे बसण्यातही काही अर्थ नाही ... उठतो आणि ती विसकटलेली चादर काढून एकदा झटकून पुन्हा व्यवस्थित घालतो. टॉवेलची घडी करतो. मग इकडेतिकडे पाहातो. चड्डी, फ्रॉक आणि ग्रजीफ्रॉक यांच्या घड्या करतो. पातळ तसेच राहाते. त्या घड्या टॉवेलसकट आतल्या खोलीत कुठेतरी ठेवून येतो. " च् टॉवेल कशाला आत ठेवला मी ! " असे म्हणत पुन्हा आत जातो आणि टॉवेल घेऊन येतो. पलंगाच्या एका बाजूच्या दांडीवर ती घडी ठेवतो. काही क्षण इकडेतिकडे पाहातो. मग खुर्च्या नीट ठेवतो. मग पुन्हा ते गाणे गुणगुणू लागतो. पण ते नीट चालीवर म्हणता येत नाही म्हणून गप्प बसतो. मग आपल्याच खांद्यावर किंवा हातावर त्या गाण्याचा ताल धरतो. गाणे मनात चालू आहे.

तेवढ्यात एक चेंडू खिडकीच्या दारावर धाडकन आपटून जातो. तो थोडा दचकतो. मग खिडकीपर्यंत जातो. बाहेर पाहातो. मग ओरडतो, " ए ऽ नीट खेळाना रे ! आँ ! तुमची बौंड्री नि सिक्सर इथं घरात नाही येता कामा हं !...कुणी मारला रे -- अं -- सुधीर का -- छान -- पण जरा हळू हं ! " मग जरा वेळ त्यांचा खेळ पाहात तिथेच उभा राहतो. दोनतील बॉल्स पाहतो. पण काहीच घडत नाही. मग -- " हत् तेरी ! काय खेळतायत --" असे म्हणत मागे वळतो. पलंगावर बसतो. तीच शीळ नव्या उत्साहाने वाजवू लागतो, पण तो उत्साह फारसा टिकत नाही. फार वेळ तेच तेच घोळवल्याने ते कंटाळवाणे वाटते

--म्हणून शीळ थांबवतो. हाताने धरलेला ताल थोडा वेळ तसाच चालू. मग तोही थांबवतो. थोडा वेळ नुसता बसून राहातो. कंटाळल्यासारखा. एक जांभई देतो. मग उभा राहातो. हळूहळू आत जातो.आतून एक ग्लासभर पाणी घेऊन येतो. बाहेर बसून शांतपणे प्यावे म्हणून खुर्चीवर बसतो.

ग्लास तोंडाला लावणार एवढ्यात त्याच्या कपाळावर आठ्या पडतात. " च्या, मुंग्या तर कुठे पण येतात. फुकट मरतात एकजात ! " ते पाणी आत जाऊन ओतून दुसरे स्वच्छ भरून आणतो. पलंगावर बसतो. मग खिडकीतून बाहेर पाहत सावकाशपणे एक घोट घेतो. काही क्षण नुसता तसाच. मग दृष्टी न हलवता सावकाश दुसरा घोट घेतो. मग ग्लासाकडे पाहातो. तो पुन्हा तोंडाला लावतो नि सगळे पाणी घटाघट पिऊन टाकतो. मग तसाच काही क्षण बसून राहातो. ग्लास शेजारीच पलंगावरच ठेवतो. काही क्षण बाहेरच्या त्या ढगाकडे पाहात राहातो. मग उठतो. उठताना त्या ग्लासाला त्याचा हात लागतो. तो हातात घेतो नि ठेवण्यासाठी आत जातो. येताना डी.डी.टी.चा पंप घेऊन येतो. बाहेर येण्याआधी आतच मारल्याचा आवाज. मग तसाच फवारा मारत बाहेर येतो. पलंगावर चढून वर कोठेतरी फवारा मारतो. मग फवारा मारतामारताच " मरायचं आहे ना ! मरा ! " असे पुटपुटतो. त्या फवाऱ्यामुळे त्याला एकदोन शिंका येतात. मग पलंगावरून उतरतो नि इकडे तिकडे पाहात आत जाऊ लागतो. एका ठिकाणी मारायचा राहिला असे
वाटल्याने पुन्हा परततो. तिथे फवारा मारतो नि मग आत जातो. पंप ठेवून येतो. पलंगावरच्या टॉवेलने हात, नाक नि तोंड पुसतो. मग दुसऱ्या खुर्चीवर बसतो.

थोडा वेळ तसाच बसून राहातो. शरीराची अस्वस्थ हालचाल करीत. पण तशा सिथतीत चैन पडत नाही. उठतो...

मग खिडकीशी जाऊन उभा राहातो. " अं ? -- हो.हो. आराम --या ना ! -- बरं--हंहं -- अच्छा !" -- रस्त्यावरून जाणाऱ्या कुणाशीतरी. जरा वेळ बाहेर पाहात राहातो. मग -- "काय रे -- वा -- सुधीर अजून खेळतोय का-- वा ! - अं ? -- दुसऱ्यसांदा बॅटिंग आलीय होय ?-- कमालाय --काय पटापट आऊट होता बेट्यांनो ! हट् !... मी येऊ का रे खेळायला...अरे हट् ... मोठा असलो म्हणून काय झालं -- मला कुठं येतंय खेळायला -- अं -- बरं बरं -- ठीकाय." थोडा वेळ खजील झाल्यासारखा उभा राहतो. मग आत वळतो. स्वयंपाकघराच्या दारापर्यंत जातो. पुन्हा वळतो. मग त्या गाण्याची नुसती चाल गुणगुणण्याचा प्रयत्न करीत दोनतीन येरझाऱ्या घालतो.

मग आतल्या खोलीत जातो. काही क्षणांनी आत ठोकाठोक केल्याचा आवाज. " हाय ऽ हा ऽ" करीत हात झाडीत बाहेर येतो. डाव्या हाताचे एक बोट उजव्या हाताने गच्च दाबून ठेवतो. मधेच डावा हात झाडतो. मधेच ते बोट तोंडात घालतो. मग बाहेर काढून पुन्हा दाबून धरतो. सोडून देतो. मग नुसता त्या बोटाकडे पाहात राहातो. मग तो हात सावकाश ढिला सोडतो. थोडासा त्रासिक, थोडासा वेदनामय, अन थोडासा खिन्न-उव्दिग्न असा चेहरा. थोडा वेळ तसाच बसून राहातो. मधून मधून त्या बोटाकडे पाहातो. ते दाबतो. सोडून देतो. त्याला ती अस्वस्थता असह्य होते. ते बोट हातात धरून खिडकीशी जातो. " ए, सुधीर ! एक काम करतोस का -- अं ? -- रामकाका आहेत का बघ बरं -- अं-- ! -- हं -- हो रामकाका. -- या म्हणावं गप्पा मारायला. मी बोलावलंय म्हणून सांग... च्... इनिंग कसली संपवतोस...जाऊन ये ना पटकन... ऐकत नाहीस काय -- बरं ! ठीकाय ..." उदासवाणेपणाने परत फिरतो. काही क्षण नुसता उभा राहातो. अस्वस्थता, एकाकीपणा नि भीती यांच्या प्रचंड दडपणाखाली असल्यासारखा. दिङ्.मूढ झाल्यासारखा. चमत्कारिक हालचाल करत. त्याच्या प्रत्येक हालचालीत एकाकीपणाची भयाण जाणीव. मनावर जणू कसलेतरी दडपण पडते आहे. वाढते आहे. विचारांच्या उजाड रानात उभा असल्यासारखा नुसता उभा राहातो. अंतराळात कुठेतरी पाहात. हालचालीत वैफल्यमिश्रित हतबलता. पाय ओढत दुसऱ्या खुर्चीपर्यंत येतो. तिला धरून उभा राहातो. जणू बसायचे विसरून. मग बसतो. मग स्वतःशीच -- " च्यायला काय असेल एकटेपणा म्हणजे ? काय असेल कंटाळा म्हणजे ? " असे म्हणतो. तसाच मूढपणे बसून राहातो. निश्चल. मग उठतो. जणू त्याला त्या विचारांचे एवढे काही वाटत नाही आहे. खिडकीशी

जातो. काहीतरी --ओरडून--म्हणणार असतो पण म्हणत नाही. मग दोरीवरचा शर्ट घेतो. तो घालू लागतो. डोके आत घातलेले असते तेवढ्यात कुणीतरी दार वाजवते. डोके बाहेर काढतो नि जाऊन दार उघडतो. दारात धोतर नि बिनहाताचा गंजीफ्रॉक घातलेला वयस्क मनुष्य. गंजीफ्रॉकवर दोनतीन भोके. केसात काळेपणाचा पुसट अवशेष. केस लक्षात येईल इतके वाढलेले. त्यांना पाहून --

तो : ओह - अप्पा तुम्ही ! -- या, या. बरं झालं आलात ते --

अप्पा : ( त्यांचे जणू या बोलण्याकडे लक्षच नाही. ) पेपर आहे का आजचा -- द्या पाहू.

तो : हो हो. आहे नं -- ( टेबलाकडे जाऊन पेपर घेऊन येतो. ) हं, हा घ्या.

अप्पा : ( पेपर घेऊन जाऊ लागतात -- ) आणून देतो तासा दीडतासात -- काय !

तो : हो. -- हं -- इथंच बसून वाचलात तरी --

अप्पा : जशी तुमची मर्जी ! ( बसण्यासाठी वळतात. )

तो : नाही. तसा नव्हता माझ्या म्हणण्याचा अर्थ. म्हटलं मलाही कटाळा आलाय --

अप्पा : हं हं ! ठीकाय. अं ! हं ! ( खुर्चीवर बसतात. चष्मा काढून पुसू लागतात. )

तो : ( हसण्याचा प्रयत्न करीत --) हं-- हं-- हं--एकटं असलं म्हणजे-- हं --( काय बोलावे ते सुचत नाही--)

अप्पा : अहो ते जाऊ द्या ! --( पेपरात बघत -- ) हे बघा -- एका शेळीला -- बरं का - एका शेळीला --एकदम -- एका वेळी बरं का -- चार -- काय -- चारं शेरडं झाली ! आता बोला ! अहो उच्चांक आहे म्हणे हा ! -- अं --

तो : कमाल हं ! रीअली !!

अप्पा : अहो खरी ' रीअली ' पुढंच आहें. त्या शेळीच्या मालकाचं -- काय -- त्या शेळीच्या मालकाचं लोक अभिनंदन करतायत म्हणे ! आता बोला ! ( मोठ्याने हसू लागतात. ) आता यात त्याचा काय संबंध अं -- ( पुन्हा हसू लागतात... )

तो : ( नुसते ओठ विलग करीत -- ) असं का ? कमाल हं !

अप्पा : ( त्याच्या हातातल्या शर्टाकडे पाहात -- ) काय कुठं बाहेर निघाला होता काय ?

तो : अं ? -- हो. काटाळा आला होता; म्हटलं जरा --

अप्पा : अस्सं -- अस्सं -- ( पुन्हा वाचू लागतात -- अगदी पेपरात बुडून. )

तो : ( शर्ट पूर्वीच्याच कॅलेंडरवर अडकवतो, मग टीव्हीजवळच्या खुर्चीवर जाऊन बसतो. थोडा वेळ तसाच जातो. मधेच बोटाकडे पाहातो. अस्वस्थ हालचाल. मग अप्पांकडे पाहातो. काही तरी बोलणार असतो पण बोलत नाही. त्यांच्याकडे पाहात नुसता बसून राहातो. त्यांना त्याची दाद नाही. ) -- हं -- हं -- तसं म्हटलं तर आपल्या लाइफमध्ये काय अर्थ आहे ? नाही ?

अप्पा : ( उगीचच ) हं ऽ ! ...अं ? काय म्हणालात ?

तो : हं -- काही नाही --

अप्पा : मग ?

तो : मग काय ! काही अर्थ नाही -- कशातच...अगदीच...

अप्पा : या तुमच्या अर्थावरलं आठवण झाली. आता मी तुम्हाला सांगतो -- बरं का -- कांदा ! -- कांदा मी गेल्या त्रेचाळीस वर्षांत खाल्लेला नाही -- आता बोला ! -- अहो उगीच नाही होत हे -- अर्थ हा आपण द्यायचा असतो -- पुण्य हाच अर्थ --

तो : हं.

अप्पा : अगदी नकळतच झालं -- किंवा करावंच लागलं पाप -- बरं का -- तर ते निराळं ! आता तेव्हा आम्ही होतो प्रवासात -- केव्हा ? -- त्रेचाळीस वर्षांपूर्वी -- जवळ डबा नाही -- खाणावळ नाही -- ओळख नाही -- शेजाऱ्याच्या डब्यात कांद्याची भाजी ! आता बोला ! घ्यावी लागली -- म्हणून म्हणतो -- पण आच पाहिजे आणि श्रध्दा पाहिजे --

तो : ( कंटाळल्यासारखा ) हं ...

अप्पा : सगळे रस्ते शेवटी एकाच ठिकाणी जातात -- ! -- लहानपणी आम्हाला मोठी माणसं सांगायची -- बरं का -- बाबा रे -- काही नाही -- कुठल्याही देवाला नमस्कार कर -- तो केशवालाच जाऊन मिळतो -- आता बोला ! -- आता हे जे आहे -- अं -- ह्यावरून काय दिसून येतं ? -- अं -- हेच की नाही ! --

अं ? -- काय हो ? --

तो : ... अं ? -- हो.

अप्पा : मग ! -- म्हणून म्हणतो -- श्रीकृष्णानं सांगितल्यासारखं आपण आपलं कार्य करीत राहावं --आता आमची 'ही ' -- आमची ही गेली पन्नास वर्षं रोज स्वयंपाक करती आहे -- आता बोला -- हां -- आता चारदोन दिवस कुठं तापात किंवा एखाद दिवस कुठं प्रवासात गेला असेल नसेल -- पण परिपाठ ! -- परिपाठच तो ! -- स्वयंपाक करायचा नि मुलांना वाढवायचं -- मग त्यात हे नाही -- अं ? असं आहे हे...तसंच आहे ते -- अं ऽ ऽ ऽ ... हं -- काय -- 'विमान कोसळले '? -- कुठं ते ऽ -- बरं का हो, विमान कोसळलं कुठं तरी -- एकशे सतरा माणसं खलास -- घ्या ! -- ( त्याची प्रतिक्रिया नाही. चेहरा भेदरल्यासारखा . ) काय बोलायचं आता -- अं -- अहो बोलणंच खुंटलं इथं -- सांगा ! तीच माणसं का मेली हो ? -- अं --त्याच दिवशी -- तेव्हाच -- त्याच विमानात बसायची का बुध्दी झाली त्यांना -- अं ? -- का ? -- सांगा नं -- शक्य नाही -- उत्तर नाही -- याला उत्तर नाही.

तो : ( अगदी खिन्न आणि दबलेल्या स्वरात -- ) -- हं ! -- खरं म्हणजे आपल्या लाईफला काही अर्थच नाही. नाही ? काय, -- तर सकाळी उठायचं, जेवायचं, ऑफिस, घर, जेवण, झोप, फार तर कधीतरी सिनेमा, नाटक नाहीतर सर्कस आणि हा टीव्ही -- आणि -- काय भयंकर आहे -- एकटंच -- बाजूला -- कुठंतरी खबदाडात -- भिंतींच्या मागे -- एकट्यानंच विचार करत बसायचं. विचार--विचार--विचार-- बाकीचे सगळे आपले आहेत म्हणायला आहेत. आपल्या मनावरचं ओझं आपलंच-- एकट्याचं. घाम गाळत रखडत ओढत राहायचं. कधी चिडायचं--संतापायचं--बडबडायचं-- हे किंवा ते काहीतरी करायचं नि करत राहायचं. काही कळत नाही. भीती वाटते. काही कळत नाही...हे...हे...हे...? एकाकीपणा नाही असं जगणं असू शकेल ?

अप्पा : बरं ते जाऊ दे. मघाशी एक सांगायचं राहिलं तुम्हाला. अहो त्या विमानाचं एक सोडा -- पण ते देवदर्शनासाठी चाललेले लोक-- म्हणजे बातमी आलीवती पूर्वी--काय ते त्यांचा पडाव--तराफा--नाव काय असेल ते उलटून का मेले हो ? सांगा ! सत्त्याऐशीतल्या अडुसष्टांना साक्षात जलसमाधी --अं-- उत्तर नाही. अं--असंच आहे हे. तर अशा उत्तर नसलेल्या पुष्कळ गोष्टी आहेत -- अहो, एकानं तर मला विचारलं की हे जगच का निर्माण झासलं ? हात जोडले, म्हटलं बाबा रे, तुझा खापरपणजोबा जरी जिवंत असता तरी तो सुध्दा या प्रश्नाचं उत्तर देऊ शकला नसता. अहो उत्तरच नाही तर देणार कसं -- आँ ? आता 'लीला ' वगैरे म्हणायचं आपण. पण खरं म्हणजे अज्ञानच. काय ? खरं की नाही-- म्हणून म्हणतो -- आपल्याला नाही कळत ते-- नाही ना कळत ? मग झालं तर ! म्हणून मी आपलं हे करतो--अं--आपलं सकाळी एक तासभर देवाची पूजा करतो. बरं का हो-- माझी मुंज झाली आठव्या वर्षी--हो, अगदी तेव्हापासून--अहो रामरक्षा काय, मनाचे श्लोक किंवा व्यंकटेश स्त्रोत्र काय किंवा चारसहा आरत्या काय पाठच ठेवलंय !-- तोंडपाठ !-- तर काय, तेव्हापासून ठरलेलं -- काय -- सकाळचा एक तास देवाला !

तो : अं ?-- न...?--हं --हो-- ( प्रचंड दडपणाखाली. )

अप्पा : अहो नाही तर काय पंपाळं वाजायला वेळ नसता लागला आमचं -- अहो देवाच्या दरबारी आम्ही किस झाडकी पत्ती -- काय ? अहो केव्हाच तीन तेरा नऊ अठरा उडाले असते ना ! तुम्ही मात्र देवाचं काही करायचं नाही आणि त्यानं मात्र -- अहो हल्ली पाण्यालासुध्दा पैसे पडतात. दुकानदार कुठला चिमूटभर माती नाही देणार पैसे मोजल्याशिवाय -- मग ! - खरं का नाही ?-- अं ? खुल्या मनानं द्यावं -- खुल्या मनानं घ्यावं. लाच घेणाऱ्यांच्या सगळ्या पिढ्या नरकात गेल्याशिवाय राहाणार नाहीत -- बघा तुम्ही-- लिहून ठेवा--आ ऽऽगदी. -- हा विचार पाहिजे--अं --का हो गप्पसे बसलात--अं ? विचारात दिसताय कसल्या तरी. असू दे. बरं का -- माझं बोलणं नका मनावर घेऊ तुम्ही -- तसं काही वाटलं तर जोड्यानं मारा मला--हं--बोलणार नाही. मोठा असलो म्हणून काय झालं ? वयानं असेन--कसं ? आता आपले ज्ञानेश्वर महाराज--अं--ते काय मोठे होते का-- अहो पण आता म्हणे एमे एमेपर्यंत कळत नाही लोकांना नीट काय लिहिलंय त्यांनी ते ! हो ! आता बोला. कोण मोठं ? असं आहे ते -- तेव्हा मी तुम्हाला सांगतो -- काळजीत असाल तर धीरानं घ्या. काही होत नाही. तेव्हा त्या वेळी तशी बुध्दी होतेच मग माणसाला--तेव्हा काही नाही -- स्वस्थ राहावे आणि जे जे होईल ते ते पाहावे--दुसरं काय -- नाही का ? अहो ' ठेविले अनंते तैसेचि रहावे ' हे उगीच का आहे ? अर्थात एक विचारसरणी म्हणून

सांगितलं तुम्हाला. अहो नाही तर कोण कुणाकडं येतोय नि कोण कुणाला सांगतोय -- अं -- आता तुम्ही या म्हणालात, चार घटका बसा म्हणालात--अं--अहो हल्लीच्या दिवसांत कोण कुणाला विचारतंय नाही तर --

तो : ( चेहऱ्यावरचे नाव बदलण्याच्या अयशस्वी प्रयत्नात -- ) हं -- खरंय -- खरंय --

अप्पा : तुमच्या सौभाग्यवती नाही दिसत त्या. आणि मुलं ?

तो : ( नीरसपणे -- ) हं--हो--बाहेर गेलेत सर्वजण -- संध्याकाळी येणाराहेत.

अप्पा : हं--असो असो. तर हे असं आहे. आपल्याही हातात नाही नि दुसऱ्याच्याही हातात नाही. आपण कोण लागून गेलो मोठे--अं--अहो प्रत्यक्ष देवाला जे चुकलं नाही--अं--खरं की नाही ?

( रामकाका प्रवेश करतात. वय पस्तीस--चाळीस. पँट, शर्ट हाताच्या घड्या केलेल्या. चष्मा. )

तो : ( किंचित उत्साहाने -- ) वा ! या रामकाका -- या.

रामकाकाः सुधीरनं सांगितलं--म्हटलं चला.

तो : एकटाच होतो--कंटाळा आल्यासारखं--( आवंढा गिळून -- ) झालं -- म्हणून --

अप्पा : हं--काय म्हणताय--हं--खराय. हल्लीच्या दिवसांत एकटं राहाणं अगदी कठीण बरं का, दुरापास्तच ते. काय खरं की नाही रामकाका ?

रामकाकाः अं ?--हो-- अहो मग आधी बोलला असतात तर पिक्चरला तरी गेलो असतो.

तो : हं--झोप काढली--बसा ना !--( टीव्हीजवळची खुर्ची ओढून पुढे घेतो. तीवर रामकाका बसतात. तो पलंगावर. ) अलीकडं मला असं वाटतंच की -- कधी कधी वाटतं की-- हुं-- आपल्या लाइफमध्ये काही अर्थ नाही --

रामकाकाः कमालय ! -- अहो ' वाइफ ' मध्ये काही अर्थ नाही हे आता कळून काय उपयोग-- अं-- ( हसत सुटतात. पण तो हसत नाही. अप्पांचं नीट लक्ष नाही-- तरी ते किंचित हसतात. ) -- अं --

तो : हं ! -- कसंतरीच वाटतं -- तेच तेच तेच--रोज तेच--बोअरिंग वाटतं--अगदी--एखाद जाड घट्ट काळंकुट्ट जनावर स्वतःच्याच शरीरात नखं खुपसत बसावं तसं काही तरी होतं मनात --

रामकाकाः ब्रेहो ! हे तर काव्य झालं !--पण ते जाऊ दे--आता एकेक गप्प काढू नि मारत बसू--अं--अहो माशा मारल्यापेक्षा गप्पा मारलेल्या बऱ्या की ! अहो कुणाचा जीव घेतल्याचं पाप तरी नाही त्यात--

अप्पा : हां--हे मात्र खरं हं. पाप हे केव्हाही वाईटच--तेच सांगत होतो मधाशी मी त्यांना. त्यांनही पटलं ते !

( रामकाका हसतात. जणू अप्पांना थांबवण्यासाठीच. )

तो : नाही. खरंच--अगदी मनापासून वाटतंय मला तसं--खोल खोल काही तरी ढवळल्यासारखं होतंय--मधेच कधीतरी एकदम असं -- असं --

रामकाकाः असेल. असेल. होतं तसं कधी कधी. छे. पण तुम्ही कमाल केलीत हं. मस्त पिक्चर होतं -- गेलो असतो.

तो : हं--( निःश्वासमिश्रित हताश ढिलेपणा. )

रामकाकाः ' मौतसे मुकाबला '-- बरंय म्हणतात -- बरं पण गेली कुठं सगळी मंडळी ? अं ?

तो : तिच्या बहिणीकडे गेलीय सकाळी मुलांना घेऊन. संध्याकाळी येणाराय--

रामकाकाः तुम्ही नाही गेलात ?

तो : नाही--भाऊ येणार होता --

रामकाकाः अच्छा. मग ठीक. अहो, तुमचा तो हा भेटला होता. कोण -- कोण तो --हां -- दिगू पेंडसे -- भलताच खुशीत होता बेटा. मधे त्या कसल्या परीक्षेला बसला होता ना -- पगार वाढला म्हणे थोडा --

तो : असं का--

रामकाकाः येणाराय म्हणाला एकदा तुमच्याकडे. म्हणजे 'तुमच्याकडे '. माझ्याकडे नव्हे--

तो : हं--

रामकाकाः त्याची बायको भलतीच फॅशनेबल आहे हं, पण ! --( त्याला ) काय डाव काढायचा का ?

तो : अं ? --

रामकाकाः खेळायचं का म्हटलं--

तो : नको वाटतंय काहीच. मन नाही लागणार--

रामकाकाः हं -- म्हणजे सबंध दिवसभर एकटेच आहात वाटतं घरात.

तो : हं -- हो ना. काहीही केलं तरी -- हं -- कसंतरीच वाटतं काही काही वेळेला --

रामकाकाः ( उथळपणे -- ) हो. हो. होतं तसं -- सगळ्यांना होतं.

तो : ( कुठंतरी दूर पाहात असल्यासारखा -- ) -- आणि मग काहीतरीच विचार येतात. कुठलेही. जुने लहानपणचे सुध्दा. लहानपणी बरं का-- माझ्या मनात एक प्रश्न येत असे-- किंवा कल्पना म्हणा --

रामकाकाः होय. सगळं आठवेल ! तेवढंच ते. अहो मग इतका कंटाळा आला होता तर आधीच बोलवायचं मला. रिकामाच बसलो होतो की !

तो : मला वाटायचं --

अप्पा : बरं का रामकाका, एक सांगतो मी तुम्हाला. काय--तर माणूस लहान असो की मोठा असो--अहो, मोठा असला तरी लहानपणासारखे विचार येतातच की नाही ! मग ! तेव्हा, त्याला काही अर्थ नाही. आणि या लहानमोठेपणाच्या कल्पनांमुळेच मग हेवेदावे, मत्सर, एकमेकांचे अपमान, मान हे सारं होतं. काय ? खरं की नाही--अं ?

रामकाकाः ( हसून -- ) हं -- खर आहे.

अप्पा : मग ठीक आहे. तर मी काय सांगत होतो की -- हां -- लहानमोठेपणाला काही अर्थच नाही. अहो ज्या गोष्टीला अर्थच नाही--अं--त्याची चिंता करत बसायचं कारण काय--सांगा ! पण नाही. मनुष्यस्वभाव ! इथे त्याला एक जोरदार शिंक येते. ) तो मोठा वाईट आहे. सगळं पटतं. कळतं. पण कळत नाही. आता काय करायचं बोला ! आणि म्हणूनच हे सगळं चाललंय बरं का. युध्द काय, आत्महत्त्या काय. काही विचारू नका. ( रामकाका कंटाळल्यासारखा सुस्कारा सोडतात. ) तर हे असं आहे. हे असं आहे एवढं सांगू शकतो आपण -- बस्स. पुढं शून्य ! --

रामकाकाः अप्पा. या वर्षी तुमचं कीर्तन ठेवू आपण गणेशोत्सवात. अं -- कीर्तन नसेल आवडत तुम्हाला तर प्रवचन करा. किंवा भाषण. अं !--

अप्पा : हं--आम्ही कसचे हो--

रामकाकाः वा--असं कसं--पण तुम्हाला सूचना अशी की तुमचा सगळा मालमसाला आतापासूनच संपवू नका. अहो मग पुढं लोकांना उत्सुकता राहाणार नाही तेवढी.

आप्पा : हं ! अहो रामकाका, तुम्हाला काय सांगू आता -- अं --काय सांगू तुम्हाला -- अहो समुद्र आहे हा समुद्र. अथांग सागर ! अहो त्यातलं भांड्या-भांड्यानं काढलं म्हणून काय संपणार आहे काय ते ! अं ! अहो एखादा मनुष्य--बरं का--एखादा मनुष्य जन्मभर जरी बोलला यावर तरी--सबंध वाळवंटातला एक कण असतो ना--तो फोडून फोडून--हे केल्यावर जे उरेल ना--अगदी बारीक चूर्ण--त्यातल्या एका कणाच्या एक हजारांशसुध्दा तो बोलला असं होणार नाही ! आता बोला !

रामकाकाः अरे बापरे ! आता काय बोलू ? ( हताशपणे त्याच्याकडे पाहातात. त्याची काहीच प्रतिक्रिया नाही. तो तसाच. एकटा. त्याच्याकडे पाहात -- ) तुम्ही काय म्हणत होता मघाशी -- लहानपणचं काहीतरी सांगत होता--

तो : --हं !--

रामकाकाः हे असलं काहीतरी विचार करीत राहाणं म्हणजे निरुपयोगी ताप आहे उगाच. आपलं आहे ते बरं. फार तर काही तरी खेळावं. सिनेमाला जावं. नाही तर फिरायला जावं. पण हे नाही उपयोगी.( त्याच्याकडे पाहात -- ) काय !

तो : हं !

रामकाकाः नाहीतर गप्पा माराव्यात भरपूर-- अहो पुस्तकं आहेत --म्यूझिक आहे--नाटकं आहेत. ते काय उगीच !-- अं ! हल्ली नाटकं तर काय निघतात ! ( विनोद करीत -- ) नक्कल जास्त--अस्सल कमी ! ( हसतात. )

तो : हं--पण--

रामकाकाः नाही पण असला फार ' पणपणाट ' बरा नाही हं ! ( हसतात. ) खरं म्हणजे याला विशेष काहीच महत्त्व नाही आहे. या विषयावर आपण इतका वेळ बोललो त्याचीसुध्दा काही जरुरी नव्हती. अहो कंटाळा काय -- यायचाच की केव्हा ना केव्हा तरी. मग तेव्हा दुसरं नवीन काही तरी करायचं. मन रमवावंच लागतं कशात तरी. ( हसत -- ) सिगरेट ओढणं--तंबाखू--तपकीर हे काय उगीच वापरतात काय लोक -- अहो मोठमोठे लेखक - कवीसुध्दा. अर्थात ती गोष्ट वेगळी--पण नाही म्हणजे आय ॲम नॉट ॲडव्हाईसिंग यू-- आमची काय ताकत आहे ॲडव्हाईसायची -- वहिनी रट्टा घालतील नाही पाठीत एक ! ( हसतात. )

तो : पण--पण--

रामकाकाः हो -- हे शक्य नाही हं -- हे शक्य नाही. अहो कंटाळ्याला कसंही टाळू शकतो आपण. ( हसतात.) का आपलं फिरायला जाऊ या कुठं तरी ?

तो : नको...

रामकाकाः ठीक आहे --

तो : वाटतं, हे सगळं कशासाठी चाललंय--कुठं जायचंय शेवटी--मूर्खासारखं काहीतरी करत राहातो आपण असं वाटतं. आपण कशासाठी जगतोय तेच कळत नाही. काही अर्थच वाटत नाही कशात--

रामकाकाः पण हे असलं तुम्ही पूर्वी कधी बोलल्याचं आठवत नाही--? ( हळूच -- ) चूकभूल द्यावी घ्यावी हं. ( हसतात. )

तो : नसेल.-- पण -- पण--

रामकाकाः चार भिंतींच्या मागे एकटंच बसलं ना बराच वेळ, तर असले विचार येतात डोक्यात. पण शहाण्यानं लक्ष देऊ नये त्याकडे. अहो डोकं फिरायचं एखादवेळेस. अं -- तुमच्या कदाचित लक्षात आलं नसेल पण तुमचं हे बोलणं अगदी चमत्कारिक आणि हास्यास्पद आहे. अहो जगातले इतके कोट्यवधी लोक जगतातच आहेत की नाही !

तो : ( खिन्न -- दबलेला -- सुस्कारा सोडून -- ) हं !

( एकदम अंधार. काही क्षणांनी मंद प्रकाश. ते अजून बोलत बसलेले आहेत. तो एकाकी. रामकाका काही तरी बोलतात. त्यावर अप्पा आपले काहीतरी सुरू करतात. कुणाचेही कुणाकडेही नीट लक्ष नाही. पुन्हा अंधार. मग मंद प्रकाश. तो अधिकच अस्वस्थ. अप्पा--मग रामकाका...अंधार. मग प्रकाशाची चमत्कारिक उघडझाप. नंतर काही क्षण फिकट प्रकाश... पुन्हा अंधार. मग मंद प्रकाश. तो प्रवेशव्दारापाशी ' हो. हो. अच्छा.' म्हणत. रामकाका आणि अप्पा गेले आहेत. खुर्चीजवळ त्याची पत्नी उभी. चांगल्या पोषाखात. शिणलेली. तो वळतो. आत येतो. तसतसा प्रकाश पूर्ववत होतो.)

तो : तू मुलांना तिकडे ठेवायला नको होतंस.

ती : अहो पण त्यांनीच हट्ट धरला-- त्यात ते म्हणाले की उद्या आणून पोचवू म्हणून.

तो : हो पण --

ती : मघाशी रामकाका म्हणत होते ते अगदी खरं आहे. त्यांच्यासमोर बोलले नाही मी.. पण आता सांगते. हल्ली काही काही वेळेला तुम्ही अगदी चमत्कारिकपणे वागता. एक दिवस बाहेर गेलं तर इतका प्रकार व्हावा नं !

तो : पण --

ती : मला नाही आवडत हे. अगदी 'जीवनात काही अर्थ नाही ' नि अमूक अन तमूक म्हणण्यापर्यंत जाता तुम्ही. लोक हसतात मागे.

तो : हं -

ती : बरं नाही दिसत ते. लोकांना असंच वाटेल ना की या माणसाला घरातच काहीतरी त्रास होत असला पाहिजे म्हणून. नाही तर मी तर म्हणते की तुम्ही आपली सरळ एकदा प्रकृती तपासून घ्या पाहू. ते सुध्दा नव्हते का म्हणत की हें असलं डोक्यात सारखं येणं बरं नव्हे --

तो : आता कृपा करून --

ती : त्या पोरांनी अस्सा त्रास दिला तिथं. हे घे, ते घे, हे पाड, ते पाङ. भांडाभांडी. काही विचारू नका. आणि त्या मोहित्यांच्याना तेवढी संधी मिळाली. म्हणे, 'क्यॅय कॅंडमॅडतॅयत प्वोरं ! ' नंतर झाली तिचीच फजीती. ऐटीत मोठा जरीचा शालू नेसून आली होती मिरवायला. चहा पिताना काहीतरी विनोद झाला वाटतं नि ही फिसकन हसली. सबंध शालूवर चहा. नि समोर बसलेल्यांवर पण ! अशी खजील झालीय म्हणता. पण तेव्हा मात्र -- हो -- मी नाही हो बोलले काही. आपल्याला काय करायचंय !

तो : बरं पण --

ती : आणि विद्याच्या सासूबाई. त्यांची ती तसली तऱ्हा ! बाहेर तीर्थप्रसादाला माणसं येताहेत नि ही बाई बसली रुसून आत. काय तर विद्यानं गडबडीत नमस्कार केला नाही वाटतं तिला. राहिला. अगदी ओक्साबोक्शी रडण्यापर्यंत गेली म्हातारी ! आता तिची समजूत काढत बसायचं की बाहेरच्या माणसांचं पाह्यचं !

तो : मग इतकं झालं तर मुलांना नाही ठेवायचं तिथं --

ती : मुलांना ठेवल्याचं काही नाही हो. राहातील एक दिवस.

तो : पण त्रास दिला तर त्यांना --

ती : काही नाही. त्रास कसा देतील -- काय वेडी आहेत की काय ती ! आणि तुम्ही का आला नाहीत म्हणून विचारून विचारून तर भंडावलं सगळ्यांनी मला -

तो : मग सांगायचंस --

ती : सगळं सांगितलं -- सगळं झालं ! पण इतकं करून भाऊजी आलेच नाहीत ना ! तुम्हाला उगीचच थांबावं लागलं --

तो : काम निघालं असेल आयत्या वेळी काही तरी --

ती : हो. तेच की. त्यांची आयत्या वेळी कामं निघतात, सगळं होतं -- ते सगळं व्यवस्थित होतं -- पण आमचा विचार करतं का कुणी ! --

तो : अगं, पण --

ती : काय पण ! काही समर्थन नकोय करायला तुम्ही ! माहीताय मला. आणि एवढं एकटं एकटं वाटायला काय झालं होतं हो तुम्हाला ?

तो : अगं आता मी तरी -- म्हणजे -- खरंच -- अगदी काहीतरीच असं -- कसंतरी वाटतं -- काही काही वेळी -- अगदी काहीही --

ती : पुरे. पुरे. समजलं.

तो : लहानपणी -- बरं का -- माझ्या डोक्यात एक विचार येत असे -- तो मग पुढंपुढं येईनासा झाला होता. हल्ली पुन्हा कधीतरी तेच आठवतं --

ती : किती पोरकटपणा हा मेला. काही मर्यादा तरी असावी म्हणते मी --

तो : अगदी कशातच काही -- काही हेच वाटत नाही --

ती : तेच म्हणते मी. म्हणूनच प्रकृती तपासून घ्या एकदा. हे असंच चालत राहिलं तर डोकं फिरायचं एखाद्या वेळेला.

तो : प्रकृतीचा काय संबंध याच्यात --

ती : आणि तुमचं तरी असं कसं हो. तुम्ही असे बसलात म्हणजे आम्हाला काय वाटत असेल याचा काही विचार ! आपल्याच नादात असू नये माणसानं फार !

तो : ( हताशपणे व हतबलतेने ) हं --

ती : काही काही माणसं कशी उत्साही असतात--तुमचंच हे जगावेगळं ! 'असंच वाटतं--नि तसंच वाटतं '! ( तो सुस्कारा टाकतो नि सुन्नपणे बसून राहातो. ती दोरीवरचे पातळ घेऊन आत जात -- ) आता त्या पोरांनी आणि तिथं गोंधळ केला नाही म्हणजे झालं. सगळीकडे हसंच व्हायचं आमचं ! ( जाते. तो केसांतून अस्वस्थपणे सावकाश हात फिरवीत असून राहातो. काही क्षण. मग तो उठतो. अस्वस्थपणे सावकाश दोनतीन येरझाऱ्या घालतो. मग नुसता उभा राहातो. नंतर खिडकीकडे जातो. बाहेर दाट अंधार. त्या अंधाराकडे पाहात उभा राहातो. वळतो. काही क्षण तसाच. तसाच उभा. ती पातळ बदलून बाहेर येते. त्याच्याकडे न पाहाताच -- ) बरं -- पत्र वगैरे आलंय का कुणाचं ? ( तो तसाच उभा - निःशब्द. ) अहो, तुम्हालाच विचारतेय म्हटलं मी !

तो : नाही --

ती : डी.डी.टी.मारलीय वाटतं --

तो : हं --

ती : आणखी काय काय केले उद्योग ? ( तो तसाच. ) रागावलात ? माझ्यावर ?

तो : ( तटस्थपणे अन शून्यपणे -- ) मी कुणावरही रागावलेलो नाही -- मी -- स्वतःवरच रागावलोय मी. स्वतःवरच रागावलोय. असले -- हे असले विचार का यावे माझ्या डोक्यात. का वागता येऊ नये मला इतरांसारखं. नेहमीप्रमाणे --पण -- पण -- ( कसलीतरी भयाण जाणीव झाल्यासारखा -- तसाच अस्वस्थ --अपूर्ण -- ) स्वतःचाच राग येतोय मला. स्वतःचीच दया येतेय. स्वतःचीच कीव वाटतेय. आणि असं का होतं ते -- ते-- मी -- मी -- टाळू शकत नाही ते. टाळू शकत नाही ... ( ती घाबरलेली. ) कसली तरी प्रचंड सावली पडावी तसं होतं. तीतून निसटता येत नाही. कुठल्याही दिशेला पळत सुटलं तरी ती संपत नाही. तशीच लांब लांब पडलेली राहाते. क्षितीजालाही भेदून -- काळी -- गूढ --

भयाण अस्वस्थता - आणि -- आणि -- मग -- मग ... सगळं निरर्थक वाटतं. जुनं वाटतं, उदास वाटतं, कंटाळवाणं नि भयाण वाटतं...काय करू मी -- मी तरी काय करू ! कदाचित -- कदाचित मला यातून एक अगदी नवा -- अगदी नवा मार्ग सापडणार असेल -- पण -- पण -- नकोय मला, नकोय -- मला भीती वाटते...मला दुसरं काही नकोय. मला हे नाही सोडायचं. मला तू हवीयस. अशोक हवाय. उमा हवीय. मला हे सारं हवंय. रामकाका -- अप्पा --पेंडसे -- ही खुर्ची -- हा ट्रँझिस्टर --( भ्रमिष्टासारखा उभा राहतो -- )

तो : नको -- नका बोलू -- असं नका बोलू. भीती वाटते मला. भीती वाटते --

तो ( जणू पूर्वस्थितीवर आल्यासारखा -- तिला समजावीत -- ) हं ! खुळी ! चल, चहा कर पाहू झक्कपैकी -- विसरून टाकायचं हे सगळं आपण. अं -- आणि नऊच्या पिक्चरला जायचंय आपल्याला. अं ! चलो ! -- भुर्रर्रर -- ते बध -- सगळं गेलं उडून. ( जणू सारे काही झाडून टाकल्यासारखा ती पूर्वीचीच शीळ जोराने वाजवू लागतो. हातांची तितक्याच वेगात ढिली हालचाल करीत -- ) ए ऽ अजून इथंच काय उभी तू ! चहा कर नं ! ( जवळजवळ ढकलतच तिला आत घालवतो. पुन्हा तीच जोरदार शीळ...काही क्षण ... मग मोठ्या आवाजात -- ) केव्हा आणून पोचवणार आहेत गं ते -- उद्या ? ( तिचे उत्तर नाही. थोडासा आत जात -- आवाज आणखी चढवीत -- ) काय गं -- केंव्हा आणून पोचवणार आहेत ते ?

ती : ( आतूनच दबलेल्या उदासीनतेने -- ) उद्या संध्याकाळी --

तो : ( बाहेर येत -- ) हं -- ( गुणगुणू लागतो. पलंगावर बसतो. उठतो. खुर्चीवर बसतो. उठतो. येरझाऱ्या घालत राहातो -- सारे काही वेगात. ) हल्ली मुंग्या काय झाल्या आहेत नाही घरात ! अगं मघाशी पाण्यात मुंग्या ! -- शिवाय रात्री डास -- म्हणून म्हटलं मरा तर मग ! बस्स. आता काही नाही ! आता खलास ! ...( काही क्षणांनी -- ) म्हणजे च्यायला जगण्याच्या पध्दती दोनच दिसतात -- एक म्हणजे प्रश्न पडू देत जगणं आणि दुसरी म्हणजे प्रश्न दडपत जगणं ! -- यांतली चांगली कुठली ? ... पडला प्रश्न !! ... ( एकदम वाद्यांचा झणत्कार ... ओरडतो ... ) ...नाही...नाही...मी येतोय...तुमच्याबरोबरच...आपण सगळे एकत्र...एकत्र...एकत्र जगू... ( हसू लागतो. मोठमोठ्याने हसत राहतो. भ्रमिष्टासारखा. एकेक आवाज वाढत जातो. शेवटी खूप व्यक्तींचा हसण्याचा आवाज... )

-- पडदा पडत जातो --

( ' सत्यकथा ' -- सप्टेंबर १९६६ मध्ये ' मेलेले ' या नावाने प्रसिध्द झालेली एकांकिका -- काटछाट आणि दुरुस्त्यांसह. )



चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा. चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११००९
दूरध्वनी -- ४२२७८४७.